ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
उप आयुक्त (विकास) यांचे कार्यालय,
जिल्हा परिषदा पंचायत समित्या,
ग्रामपंचायतींचे संगणकीकरण करण्याबाबत
प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संगणक २०१०/प्र.क्र.४५ /सं.क.
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १६ नोव्हेंबर २०१०

वाचावे : १)शा.नि.सा.प्र.वि.क्र. सीओएम १०००/प्र.क्र.१७४/०१/३९,दि. २९.१०.२००१
२) शा.नि.सा.प्र.वि.क्र. सीओएम १०९८/प्र.क्र.५१/९८/३९,दि. १५ फेब्रुवारी २००५

प्रस्तावना :

माहिती तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर व्हावा यासाठी प्रशासकीय विभागाचे संगणकीकरण करण्याकरिता शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. सीओएम १००१/प्र.क्र.१७४०१/३९, दिनांक २९.१०.२००१ अन्वये शासकीय कामकजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्याची कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. ग्राम विकास व जलसंधारण विभाग व जिल्हा परिषदा यांच्या मार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या विविध लोकाभिमुख योजना राबविण्यात येतात. या योजनांची अंमलबजावणी करण्याकरिता शासनाच्या विविध विभाग व कार्यालयांशी संपर्क साधण्याकरिता त्यांचे संगणकीकरण केल्यास त्यांत पारदर्शकता येवून नागरिकांना माहिती पुरविणे शक्य आहे.

## शासन निर्णयः

ग्राम विकास व जलसंधारण विभाग, व विभागाच्या अखत्यारितील जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींचे संगणकीकरणाच्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तसेच सुसूत्रीकरणासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (मा.तं.) | सदस्य |
| उप सचिव (नियोजन विभाग) | सदस्य |
| उप सचिव (वित्त विभाग) | सदस्य |
| राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र,प्रतिनिधी | सदस्य |
| तज्ञ सदस्य -प्रो. पी.के.पंडया,(TIFR) | निमंत्रित |
| उप सचिव (पंचायत) | सदस्य |
| उप सचिव (ग्रा.वि.-संगणक) | सदस्य सचिव |

२. **प्रकल्प अंमलबजावणी समितीची कार्यकक्षा :**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,उप आयुक्त (विकास) यांचे कार्यालय,जिल्हा परिषदा,पंचायत समित्या व ग्रामपंचायतींच्या कार्यालयाचे संगणकीकरण तसेच आवश्यक तेथे नागरिकांना तात्काळ माहिती उपलब्ध करुन देण्यासाठी करावयाच्या संगणकीकरणाच्या बाबी.

२)विभागाच्या संगणकीकरण व त्याअनुषंगिक आवश्यक बाबी.

३. समिती संगणकीकरण प्रकल्पाच्या अंमलबजावणीसंबंधी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २९.१०.२००१ आणि दिनांक १५.२.२००५ च्या निर्णयातील तरतूदींचे पालन होईल,याबाबत दक्षता घेईल.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५.२.२००५ च्या शासन निर्णयानुसार समितीवरील तज्ञ सदस्यास ₹१०००/- एवढे मानधन (प्रवासभत्यासह) अनुज्ञेय राहील. यावरील खर्च "मागणी क्रमांक एल-४,३५५१ -सेक्रेटरीएट आर्थिक सेवा ०९० सेक्रेटरिएट(०१)(०१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, १३ कार्यालयीन खर्च (३४५१००८२)"यामधून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१११६१९११३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(दि.ग.मोरे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
शासनाचे मुख्य सचिव,
शासनाचे अपर मुख्य सचिव,
शासनाचे प्रधान सचिव/सचिव,
प्रधान सचिव,माहिती तंत्रज्ञान,मंत्रालय,मुंबई.
महालेखापाल-१,(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र,नागपूर.
मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव.
अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई / लेखाकोष भवन,वांद्रे (पूर्व),मुंबई.
निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
तज्ञ सदस्य प्रो. पी.के.पंडया, टाटा इन्स्टीटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च (TIFR),मुंबई.
जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
उप सचिव,नियोजन विभाग,
उप सचिव,वित्त विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती, संगणक कक्ष